**पाणीपट्टीपोटी देय रकमांचा भरणा करण्यासाठी रु.१००० व रु.५०० मुल्यांच्या जुन्या नोटांचा वापर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१६/(प्र.क्र.५१३ /२०१६)/सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १६ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासन, वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.६४/कोशा प्रशा- ५, दि.१०/११/२०१६.

२) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाची अधिसूचना क्र. S.O. ३४२९ (E), दि.१०/११/२०१६.

३) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाची अधिसूचना क्र. S.O. ३४४५ (E), दि.११/११/२०१६.

४) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाची अधिसूचना क्र. S.O. ३४४८ (E), दि.१४/११/२०१६

**प्रस्तावना :-**

केंद्रशासनाने रु.५०० व रु.१००० मुल्याच्या जुन्या नोटा रद्द करण्याचा निर्णय दिनांक ०८.११.२०१६ रोजी घेतला आहे. केंद्रशासनाच्या उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या अधिसूचनेनुसार पाणीपट्टी व विद्युत देयकाची वसुली करण्यासाठी जुन्या रु.५०० व रु.१००० मुल्याच्या नोटा स्वीकारण्यास अनुमती दिली आहे. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत :-

**शासन परिपत्रक :-**

जलसंपदा विभाग व विभागाच्या अधिनस्त सर्व क्षेत्रीय कार्यालये व सर्व सिंचन विकास महामंडळे यांना दिनांक ८.११.२०१६ पूर्वीच्या देयकापोटी येणे असलेल्या पाणीपट्टीच्या (सिंचन , बिगर सिंचन) देय/थकीत रकमा उपरोक्त संदर्भातील तरतूदीनुसार रोखीने रु.१००० व रु.५०० च्या जुन्या चलनात स्विकारण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीनतेने अनुमती देण्यात येत आहे :-

१) वसुल करावयाची रक्कम ही दि.०८/११/२०१६ पर्यंत वा तत्पुर्वीच्या देयकाची असावी.

२) दिनांक ०८.११.२०१६ नंतरच्या करापोटी आगाऊ रकमांचा भरणा स्विकारण्यात येऊ नये.

३) भरणा करण्यात येणारी रक्कम ही कोणत्याही परिस्थितीत ना परतावा (Non Refundable) राहील, व तशी स्पष्ट कल्पना संबंधितास देण्यात यावी.

४) विवादीत रकमा अथवा प्रतिसाक्षीत (Under Protest) रकमा स्विकारण्यात येऊ नयेत.

५) त्रयस्थ पक्षाने भरणा करण्याची मागणी केल्यास वैध पुराव्यासह त्याच्या ओळखीची पडताळणी व मुळ दात्याच्या लिखीत प्राधिकार पत्रासह भरणा स्विकारण्यास हरकत नाही.

६) सदर सुट ही दि.२४/११/२०१६ च्या मध्यरात्रीपर्यंत अनुज्ञेय असेल.

उक्तप्रमाणे करावयाचा भरणा सुरळीत पार पडण्याच्या दृष्टीने सर्व क्षेत्रीय कार्यालये/महामंडळे यांनी सदर आदेशांना पुरेशी प्रसिद्धी द्यावी व भरणा विनासायास पार पडावा याद्दष्टीने पुरेशी व्यवस्था व उपाययोजना करावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१६१११६१८०७३०५८२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjiv A Tatu

Digitally signed by Sanjiv A Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SE and Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv A Tatu
Date: 2016.11.16 18:11:58 +05'30'

**(सं.अ. टाटू)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
३) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४) सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य
५) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
६) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
७) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
८) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
९) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१०) अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव, महाराष्ट्र विधामंडळ सचिवालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, जलसपंदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक, जलसपंदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहाय्यक, जलसपंदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व कार्यकारी संचालक/महासंचालक, जलसंपदा विभाग
१६) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१७) सहसचिव(कोषा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव/ सर्व अधीक्षक अभियंता व उपसचिव/ सर्व सहसचिव/उपसचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
२०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२१) सर्व कोषागार अधिकारी,
२२) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
२३) निवडनस्ती